छत्रपती शिवाजी महाराज टर्मिनल (सी.एस.एम.टी) स्टेशन समोरील झुणका भाकर केंद्राच्या मागील मोकळया जागेवरील अल्पोहार स्टॉलच्या बांधकाम खर्चास प्रशासकीय मान्यता देणेबाबत..

# महाराष्ट्र शासन
## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
## शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-३०१७/प्र.क्र.१८९/क्रीयुसे-१,

शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
तारीख: १६ नोव्हेंबर, २०१८

वाचा -

१. **शासनाचे समक्रमांकाचे दिनांक ०५ डिसेंबर, २०१७ चे पत्र.**
२. **उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, मुंबई विभाग, मुंबई यांचे क्र.उपसंक्री/झुभाकें/सु.शे./स्टॉल/न.क्र.२०/का-७/१९५२, दिनांक ०८ ऑक्टोबर, २०१८.**
३. **शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.अनुवि-४९१८/(४२/१८)/अर्थसंकल्प, दिनांक १४ नोव्हेंबर, २०१८.**

प्रस्तावना -

छत्रपती शिवाजी महाराज टर्मिनल (सी.एस.एम.टी) स्टेशन समोरील भुयारी मार्गाच्या प्रवेशद्वारा समोरील बंद असलेल्या झुणका भाकर केंद्राच्या मागील मोकळया जागेपैकी २०० चौ.फुट जागा अंध अपंगाना वाणिज्यिक प्रयोजनासाठी द्यावयाच्या धोरणानुसार कु.सुचिता शेट्टी यांना अल्पोपहार स्टॉलसाठी काही अटींच्या अधीन राहुन खास बाब म्हणून वितरीत करण्यास संदर्भाधीन क्र.१ च्या पत्रान्वये मान्यता दिली आहे. सदर अल्पोपहार स्टॉलच्या बांधकाम खर्चास प्रशासकीय मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

सन २०१८-१९ या वर्षाकरीता कार्यलय इमारतीचे बांधकाम या कार्यक्रमांतर्गत अर्थसंकल्पीत तरतूदीपैकी रु.७,१०,७३७/- (रुपये सात लाख दहा हजार सातशे सदतीस फक्त) इतकी तरतूद झुणका

भाकर केंद्राच्या मागील मोकळया जागेवरील अल्पोहार स्टॉलचे बांधकाम करण्यासाठी वितरीत करण्यास या विभागाने दिनांक १४.११.२०१८ च्या संदर्भाधीन क्र.३ येथील शासन निर्णयान्वये मान्यता दिली आहे. शासन या निर्णयाद्वारे रु.७,१०,७३७/- (रुपये सात लाख दहा हजार सातशे सदतीस फक्त) इतकी रक्कम या विभागाच्या जागेवर उपरोक्त बांधकाम करण्यास प्रशासकीय मान्यता देत आहे.

२. सन २०१८-१९ मध्ये कार्यलय इमारतीचे बांधकाम याकरीता उपलब्ध झालेल्या रु.२००.०० लक्ष एवढया तरतुदी मधून सदर निधी वितरीत करण्यात यावा.

I. उपरोक्त निधी आवश्यकतेनुसार मान्य निकषानुसार खर्च करण्यात यावा. ज्यावेळेस निधी प्रत्यक्ष खर्च करावयाचा त्याच वेळी आंहरीत करावा. शासन लेख्याबाहेर बँक खात्यात हा निधी ठेऊ नये.

II. राज्य शासनामार्फत वेळोवेळी वित्त विषयक निर्गमित करण्यात आलेले विविध आदेश/नियम/ शासन निर्णय वित्तीय नियमावली यांची अंमलबजावणी करुन वरील वितरीत तरतूदीचा विनियोग करण्याच्या अधीन राहून उपरोक्त तरतूद वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. वित्त विभाग दिनांक ०२.०४.२०१८ च्या परिपत्रकातील सूचनानुसार उपरोक्त तरतुद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, मुंबई विभाग, मुंबई यांना आहंरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४ उपरोक्त संदर्भात होणारा खर्च हा " मागणी क्र. ई-४, ४२०२, शिक्षण, क्रीडा, कला व संस्कृती यावरील भांडवली खर्च, (०१), सर्वसाधारण शिक्षण, २०२, माध्यमिक शिक्षण, (००)(०४) शिक्षण उपसंचालक व शिक्षण विभागाच्या कार्यालय इमारतीचे बांधकाम (४२०२ ६२२८), ५३, मोठी बांधकामे" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व त्याअंतर्गत यावर्षी केलेल्या मंजूर अनुदानामधून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१११७१३४२५१९७२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Shankarrao Pawar

Digitally signed by Rajendra Shankarrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, cn=Rajendra Shankarrao Pawar
Date: 2018.11.17 13:49:24 +05'30'

**( राजेंद्र पवार )**
उप सचिव , महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.राज्यपाल तथा अध्यक्ष, आंतरविद्यापीठ क्रीडा महोत्सव आयोजन समिती, मुंबई.
२) मा.मंत्री, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३) मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा / विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक, मुंबई.
४) सर्व विधानसभा / विधानपरिषद सदस्य यांचे स्वीय सहायक.
५) प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा,महाराष्ट्र राज्य, पुणे.
७) उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, शिवछत्रपती क्रीडा संकुल, म्हाळुंगे-बालेवाडी, पुणे.
८) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
९) महालेखापाल (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
१०) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई. (संचालनालयामार्फत)
११) सर्व जिल्हा कोषाधिकारी (संचालनालयामार्फत)
१२) वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे. (संचालनालयामार्फत)
१३) नियोजन विभाग (का.१४७१), मंत्रालय, मुंबई.
१४) वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई.
१५) ग्रंथपाल, विधीमंडळ ग्रंथालय, विधानभवन, मुंबई.
१६) मा.मंत्री (शालेय शिक्षण व क्रीडा ) यांचे खाजगी सचिव.
१७) अर्थसंकल्प शाखा, शालेय शिक्षण व क्रीडा, मंत्रालय, मुंबई.
१८) निवडनस्ती, क्रीयुसे-१.